# -:: भाषा धोरणासंदर्भात आंतरराष्ट्रीय संशोधन ::-

(मातृभाषेने उघडतात शिक्षण, ज्ञान आणि इंग्रजी शिकण्याची दारे)

## १. प्रास्ताविक : (भूमिका)

केंद्रीय प्रशासकीय सेवांमध्ये इंग्रजीला पूर्वीपेक्षा जास्त महत्त्व देणे आणि भारतीय भाषांचा दर्जा कमी करण्याच्या प्रस्तावामुळे भाषेच्या संदर्भातील चर्चेला आणखी गती मिळाली आहे. हा निबंध सरकारच्या या निर्णयाच्या विरोधात लिहिला गेला होता. केंद्र सरकारने आपला हा प्रस्ताव १५ मार्च २०१३ ला परत घेतला, पण भारतात भारतीय भाषांची स्थिती ही अतिशय वाईट बनली आहे. त्यामुळे हा निबंध प्रकाशित केला जात आहे.

तसे पाहिले असता स्वातंत्र्योत्तर काळात भारतीय भाषांना ते स्थान प्राप्त होऊ शकले नाही, जे त्यांना प्रत्येक कारणामुळे मिळायला पाहिजे; परंतु मागील काही तीसेक वर्षांपासून भारतीय भाषांची दुरावस्था आणखी वाढली आणि इंग्रजी भाषा भारतीय भाषांना विस्थापित करु लागली आहे, विशेषतः शिक्षणा(च्या) माध्यम रुपात. याचे मूळ कारण स्वार्थ आहे, पण यासंदर्भात जे तर्क दिले जातात ते काही खालील प्रमाणे आहेत.

१. इंग्रजी ही ज्ञान-विज्ञानाची भाषा आहे आणि ज्ञान-विज्ञानातील प्रगतीसाठी इंग्रजीमध्ये पारंगत असणे आवश्यक आहे.

२. इंग्रजी ही एक आंतराष्ट्रीय भाषा आहे आणि तिच्याशिवाय आंतरराष्ट्रीय देवाण-घेवाण शक्य नाही.

वरील प्रकारचे तर्क ज्ञान-विज्ञान, शिक्षण, भाषा आणि आंतरराष्ट्रीय स्थितीच्या बाबतीत शंभर टक्के अज्ञानाचा पुरावा आहे. या लेखाचा उद्देश या अज्ञानाचा पर्दाफाश करणे हा आहे.

## २. शिक्षण आणि मातृभाषा :

सर्वप्रथम सांप्रतकाळी विकासासाठी सर्वात महत्त्वपूर्ण क्षेत्र ज्ञान-विज्ञान आणि भाषेच्या संबंधातील विषयामध्ये आंतरराष्ट्रीय ज्ञान आणि कल्पनांवर नजर टाकणे उचित होईल. खालील

वाक्य संयुक्त राष्ट्र संघाच्या शिक्षण, विज्ञान आणि संस्कृती समिती (यूनेस्को) चे पुस्तक 'शिक्षणात स्थानिक भाषांचा वापर' मधून आहे.

''हे स्वयंसिद्ध आहे की मुलांसाठी शिक्षणाचे सर्वात उत्तम माध्यम त्याची मातृभाषा आहे. मनोवैज्ञानिक स्तरावर ही सार्थक चिन्हांची अशी प्रणाली आहे की, जी आकलन आणि अभिव्यक्तीसाठी त्याच्या मेंदूत स्वयंचालकाच्या रुपात कार्य करते. सामाजिक स्तरावर ज्या मानवी समूहाच्या सदस्यांशी त्याचा संबंध येतो त्याच्याशी एकरुप होण्याचे ते साधन आहे, शैक्षणिक स्तरावर तो मातृभाषेच्या माध्यमाने एका माहिती नसलेल्या माध्यमापेक्षा लवकर शिकतो.''(यूनेस्को, १९५३:११)

यूनेस्कोचे हे मत म्हणजे विस्तृत अध्ययनानंतरचा निष्कर्ष होता. याप्रमाणेच यूनेस्कोने १९६८ मध्ये आपल्या पुस्तकात पुनरुक्त केले : शिक्षणासाठी ''मातृभाषेचा वापर जेवढ्या दूरपर्यंत शक्य आहे तिथपर्यंत केला पाहिजे.'' (पृ.६९१) आणि संयुक्त राष्ट्राच्या २००४ च्या विकास प्रस्तावात हे समाविष्ट आहे : ''फिलिपीनमध्ये द्विभाषा सूत्र अवलंबिले गेले. दोन भाषेतील (टागालेग आणि इंग्रजी) पारंगत विद्यार्थी त्या विद्यार्थ्यांना पाठीमागे टाकायचे जे विद्यार्थी घरामध्ये टागालोग मध्ये बोलत नसत.''(पृ.६१) आणि पुढील वाक्य तर मुख्यतः इंग्रजी भाषक देश अमेरिकेच्या बाबतीत आहे : ''अमेरिकेमध्ये ज्या नवायो भाषक मुलांना प्राथमिक स्तरावर त्यांची प्रथम भाषा (नवायो) आणि द्वितीय भाषा (इंग्रजी) दोन्ही भाषेत शिकविल्या गेले, नवायो भाषक मुलांनी त्या मुलांना मागे टाकले ज्यांना केवळ इंग्रजीमध्येच शिकविल्या गेले होते.''(उपरोक्त) (या निबंधात 'द्वितीय भाषा' आणि 'विदेशी भाषा' समानार्थक आहे.)

भारतीय इंग्रजी भक्तांना हे निवेदन आहे की, त्यांनी माहिती करुन घ्यावी की अमेरिका, कॅनडा, न्यूजिलँड आणि ऑस्ट्रेलिया सारख्या मुख्यतः इंग्रजी भाषक देशांमध्ये किती मोठ्या प्रमाणात शाळांमधून शिक्षणाचे माध्यम इंग्रजी नाही.

पुढे दिली जाणारी अवतरणे या विषयावर जगात भिन्न-भिन्न ठिकाणी झालेल्या अध्ययनातील आहेत. -

''याप्रमाणे मोदिआनो (१९६८, १९७३) ने मेक्सिकोत केलेले संशोधन, सकतनब-कांगसने फिनलँडमध्ये केलेले संशोधन आणि त्या लॅटिन अमेरिकेतील अध्ययन, ज्याचा सारांश गुदशिंसकी (१९७५) मध्ये दिलेला आहे, त्यांचे निष्कर्ष एक-साररूप वाटतात. या अभ्यासामध्ये दाखविले गेले आहे की, ज्या मुलांचा एक मोठा गट आपले शिक्षण स्थानिक भाषेत सुरुवात करतो, आपल्या मातृभाषेत साक्षरतेचा विकास करुन घेतो आणि विषय तथा दुसऱ्या भाषेवर त्या मुलांच्या तुलनेत प्रभुत्व मिळवितो ज्यांना फक्त द्वितीय भाषेत शिकविल्या गेले. (Tucker,१९७३:३)(येथे द्वितीय भाषाचा अर्थ विदेशी भाषा आहे.)''

पुढील अवतरण फिनलँडहून स्वीडनला प्रवास करणाऱ्या मुलांवर केलेल्या अभ्यासातील आहे. या अभ्यासांती असे आढळून आले की, ज्या फिनिश मुलांनी मातृ-भाषेवर प्रभुत्व मिळविले होते त्यांचे शैक्षणिक गुण चांगले होते, मग स्वीडनमधील शिक्षण स्वीडिश भाषेत असले तरी.

''निरीक्षणामधून हे पुढे आले की फिनिश भाषा प्राविण्याचा गणितात मिळालेल्या गुणांशी सरळ संबंध आहे. स्वीडिशच्या तुलनेत फिनिश गणितातील गुणप्राप्तीसाठी जास्त महत्त्वपूर्ण आहे, मग गणित स्वीडिश भाषेत शिकविल्या गेले तरी. निष्कर्ष या दृष्टिकोणाचे समर्थन करतात की गणितातील संकल्पनात्मक प्रक्रियेसाठी मातृ-भाषेतील अमूर्तीकरण स्तर महत्त्वपूर्ण आहे. जीवशास्त्र, रसायनशास्त्र आणि भौतिक शास्त्र यामध्ये सुद्धा संकल्पनात्मक विचार महत्त्वाचा असतो. या विषयामध्ये सुद्धा आपली मातृ-भाषा प्रवीण प्रवासी मुले त्या मुलांपेक्षा कितीतरी सफलता प्राप्त करतात ज्यांचे मातृ-भाषेवर प्रभूत्व नसते. (Skutnabb-Kangas आणि Toukomaa, १९७६)'' (Paulston, १९७७:९४ मधून उद्धृत)

**अमेरिकेच्या बाबतीत आणखी एक गोष्ट पहा :**

''अलिकडे अमेरिकेमध्ये हळूहळू हा समज रुजू लागला आहे की गैर-इंग्रजी भाषक नागरिकांना इंग्रजी शिक्षण प्रणालीमध्ये टाकणे आणि त्यांच्या मातृ-भाषा विकासाकडे दूर्लक्ष करण्यामुळे चांगले निष्कर्ष निघत नाहीत.'' (Tucker, १९७७:३)

घाना मधील झालेल्या एका अभ्यासात आढळून आले की, ''.... घानामधील फक्त पाच टक्के मुलं शालान्त परीक्षा आणि जायरमध्ये फक्त तीस टक्के मुलं प्रथम चार वर्ग पूर्ण करु शकतात. लेखक याचे कारण शिक्षणाची माध्यम भाषा पूर्ण अवगत करुन शकणे असे मानतात.'' (Tucker, १९७७:३)

ही धारणा देखील चूक आहे की विद्यार्थ्यांस जर इंग्रजी येत नसेल तर तो विज्ञान आणि गणित हे विषय शिकू शकणार नाही. कारण ''वैज्ञानिक संकल्पना या कोण्या एका भाषा किंवा संस्कृतीशी निगडित नसतात. रशियन, जर्मन आणि फ्रेंच लोकांना आपलया अत्युच्च वैज्ञानिक संशोधनाचा अभिमान आहे आणि हे संशोधन त्यांनी इंग्रजी भाषेशिवाय केले आहे. २००३ मध्ये गणित आणि विज्ञानाच्या क्षेत्रातील अभ्यासात शिखरावर असणारे पाच देश (सिंगापूर, कोरिया, हाँगकाँग, चीन आणि जपान) ते होते ज्यांची इंग्रजी प्रथम भाषा नाही.''

असेच नॉर्वेच्या ग्लोबल मोनीटरींग रिपोर्ट (Benson, २००५) मध्ये हे स्पष्ट केले आहे कीः

''योरुबा माध्यम प्राथमिक शिक्षण प्रकल्प (Fofunwa etal १९७५; Akinnaso,१९९३; आणि माहितीसाठी Adegpiya, २००३ पहा) नुसार पूर्णतः प्रमाणित झाले आहे की, मातृ-भाषा माध्यमामध्ये पूर्ण सहा वर्षाचे शिक्षण आणि द्वितीय भाषा इंग्रजीला एका विषयाच्या रुपात शिकविणे केवळ शक्यच नव्हते तर यानुसार पूर्ण शिक्षण इंग्रजी माध्यमातून करण्यापेक्षा चांगले परिणाम समोर आले.''

''अलिकडील संशोधनही हेच प्रमाणित करते आणि मातृ-भाषावर आधारित द्विभाषा शिक्षणाच्या सकारात्मक बाजूस समोर आणून आणखी पुढे घेऊन जात आहे.''(Benson, २००५), (मातृ-भाषेवर आधारित द्विभाषा शिक्षणाचा अर्थ हा आहे की, मातृ-भाषा माध्यमामध्ये शिक्षण झाले पाहिजे आणि विदेशी/द्वितीय भाषा ही एक विषय म्हणून शिकविली पाहिजे.)

या प्रमाणे आम्ही पाहिले आहे की, पूर्ण जगामध्ये वेळोवेळी हे सिद्ध झाले आहे की शिक्षणात मातृ-भाषेमुळे जेवढी सफलता प्राप्त होते तेवढी सफलता विदेशी भाषा माध्यमाने

प्राप्त होऊ शकत नाही. असे म्हणणे अनाठायी होणार नाही की, शिक्षणातील सफलता फक्त मातृ-भाषा माध्यमानेच शक्य आहे. खालील काही बाबी त्या कारणांना उजागर करतात.

''मूल आपले म्हणणे आपल्या भाषेत सहजरीत्या व्यक्त करु शकते, कारण यात त्याला चुका करण्याची भीती असत नाही. मातृ-भाषेवर आधारित शिक्षणामध्ये विद्यार्थी पूर्णपणे सहभागी होतात कारण त्यांना जे सांगितले जाते किंवा विचारले जाते त्याचे यथायोग्य आकलन त्यांना होत असते. संकल्पना निर्मिती आणि वास्तव विश्लेषणासाठी, आपल्या विचार प्रकटीकरणासाठी आणि जो विचार त्यांच्या डोक्यात पक्केपणी रुजला आहे त्यात नवीन काही भर घालण्यासाठी ते मातृ-भाषेचा त्वरीत उपयोग करु शकतात. मातृ-भाषेवर आधारित शिक्षण शिक्षकांना सुद्धा उपयुक्तता प्रदान करते, विशेषतः जेव्हा ते विदेशी भाषेपेक्षा स्थानिक भाषेत पारंगत असतात तेव्हा, कारण अशा परिस्थितीत विद्यार्थी स्वतःस चांगल्या प्रकारे व्यक्त करु शकतात आणि शिक्षण सुद्धा विद्यार्थ्यांने काय शिकले आहे हे व्यवस्थीत पारखू शकतात आणि कोणत्या बाबतीत विद्यार्थ्यास आणखी मार्गदर्शनाची आवश्यकता आहे हे शिक्षकास कळू शकते. मातृ-भाषेवर आधारित शिक्षण लोकांच्या समूह ज्ञानास शालेय प्रणालीशी जोडण्याचा एक आधार तयार करते. स्थानिक प्रज्ञावंत, सामूहिक संस्कृती आणि इतर बुद्धिवंतांना सोबत घेऊन मातृ-भाषेवर आधारित शिक्षण व्यवस्था स्वतःची शैक्षणिक सामुग्री तयार करण्याचीही शक्यता असते. मातृ-भाषेतील शिक्षण पालकांच्या दृष्टीनेही उपयुक्त ठरु शकते, कारण पाल्यांच्या शिक्षणात ते स्वतः सक्रिय सहभाग नोंदवू शकतात, कारण ज्ञानभाषा आणि जनभाषा या एकच असल्यामुळे हे शक्य होते.'' (Recardo and Nolasco (२००९))

भाषाशास्त्रज्ञ आणि शिक्षणतज्ज्ञांच्या मते जर मातृ-भाषेतून शिक्षण नसेल तर मूल नवीन भाषा अवगत करण्यासाठीच खूप वर्षे वाया घालवत असते, कारण अशा स्थितीत ''विद्यार्थी आणि शिक्षकाचे लक्ष फक्त भाषेवरच केंद्रित होते आणि विज्ञान, गणित आणि विद्याभ्यासाकडे जात नाही.''(Recardo and Nolaso, २००९:११)

वर आपण पाहिले की जागतिक संशोधन आणि तज्ज्ञ यांच्या मते फक्त मातृ-

भाषेतील शिक्षणामधूनच सफलता प्राप्त होऊ शकते. पण आपल्या भारतात मात्र शिक्षण आणि भाषा धोरण ठरविणारे मात्र डोळ्यांवर अज्ञानाची पट्टी बांधून आणि कानात इंग्रजीचे बोळे कोंबून इंग्रजी-इंग्रजी असा कंठशोष करत आहेत आणि देशातील शिक्षण, भाषा आणि संस्कृतीला विनाशाच्या खाईकडे ढकलत आहेत. हा लेख म्हणजेच हे अज्ञान दूर सारुन आणि कानातील बोळे काढण्यासाठीचा एक विनम्र प्रयत्न आहे.

खाली दिले जाणारे आंतरराष्ट्रीय संशोधन आणि तज्ज्ञांचे निष्कर्ष हे अज्ञान दूर करण्यासाठी मदत करील अशी अपेक्षा आहे. हे निष्कर्ष दृष्टीस आणून देतात की, मातृ-भाषेतील शिक्षण फक्त शिक्षणातच यशस्वी होण्यासाठी उपयुक्त नाही, तर विदेशी भाषा अवगत करण्यासाठी सुद्धा मातृ-भाषेतील शिक्षणाचे माध्यम मदत करत करत असते.

**३. विदेशी भाषा शिक्षण आणि मातृ-भाषा माध्यम विरुद्ध विदेशी भाषा माध्यम :**

☐ युनेस्कोच्या उक्तीने प्रारंभ करणे उचित ठरेल.

**३.१ मातृ-भाषेतील शिक्षण आणि विदेशी भाषा शिकणे - तीन अंधविश्वासांचे खंडण -**

भाषा आणि शिक्षणाच्या बाबतीत आपल्या मार्गात काही अंधविश्वास अडथळे निर्माण करतात आणि लोकांचे डोळे उघडण्यासाठी या अंधविश्वासास दूर करणे महत्त्वाचे आहे. असाच एक अंधविश्वास म्हणजे विदेशी भाषा शिकण्याचा एक चांगला मार्ग म्हणजे शिक्षणाच्या माध्यमाची भाषाच विदेशी पाहिजे. (खरेतर विदेशी भाषा एका विषयाच्या रूपात शिकणे हे जास्त फलदायी ठरते) दुसरा अंधविश्वास असा की, विदेशी भाषा जेवढी लवकर शिकवायला सुरुवात करता येईल तेवढ्या लवकर केली पाहिजे. (लवकर शिकण्यामुळे त्यात स्पष्टोचारिता प्राप्त करता येईल पण त्यातही त्यालाच जास्त फायदा होईल ज्याची मातृ-भाषेवर चांगली पकड आहे) तिसरा अंधविश्वास असा की, मातृ-भाषा ही विदेशी भाषा शिकण्यातील एक अडगळ आहे. (मातृ-भाषेतील चांगल्या यशप्राप्तीनंतरच विदेशी भाषा चांगल्या प्रकारे शिकता येते.) हे स्पष्ट आहे की, हे अंधविश्वास आहेत, सत्य नाहीत; पण तरीही धोरणकर्त्यास भाषेवर प्रभुत्व कसे मिळविले पाहिजे याचे सूचन मात्र हे करत असतात.(युनेस्को, २००८:१२)

वरील विचार ज्या अभ्यासातून घेतलेले आहेत ते सर्व द्विपकल्पातील बारा देशांच्या अभ्यासावर आधारित आहेत आणि या देशांमध्ये भारताचा देखील समावेश आहे.

असाच एक अभ्यास फिनलँडहून स्वीडनला जाणाऱ्या मुलांवर आधारित आहे. या अभ्यासातून हे प्राप्त झाले आहे की, ''फिनलँडमध्ये कितीतरी वर्ष शाळेत जाण्याच्या कारणास्तव कोणत्याही विद्यार्थ्यास जितकी फिनीश चांगली येत होती तेवढ्याच चांगल्या प्रकारे तो स्वीडिश शिकत होता. एकाच पालकांच्या मुलांच्या भाषा संपादन निरीक्षणातून हे स्पष्ट झाले की, जी मुले साधारणतः दहा वर्षाच्या आसपास स्वीडनला आले त्यांनी फिनीश भाषेचा स्तर कायम तर ठेवलाच स्वीडिश भाषत्तही स्वीडिश मुलांसारखीच शिकली. जी मुले सहा वर्षापेक्षा कमी वयात स्वीडनला आली अथवा ज्यांचा जन्म स्वीडनमध्येच झाला, त्यांचे निष्कर्ष फार काही चांगले नव्हते. अशा मुलांचा बारा वर्षात स्वीडिश भाषेतील विकास खुंटतो कारण त्यांच्या मातृ-भाषेचा पाया पक्का नसतो.''(Paulston, १९७७:९२-९३)

मग हे स्पष्ट आहे की, विदेशी भाषा सुद्धा मातृ-भाषा माध्यमातून शिकण्याने विदेशी भाषा माध्यमापेक्षा चांगल्या प्रकारे येते असे का होते? हे खालील विचारांवरुन स्पष्ट होईल.

''बुजकम (Butzkamm) यांचा आग्रह आहे की, विदेशी भाषा शिकणे आणि शिकविणे यासाठी मातृ-भाषेच्या स्त्रोताच्या योगदानाबद्दल पुन्हा स्पष्ट करणे आवश्यक आहे. मुले जशी मोठी होतात :

१) ते परिसराला विचाराच्या रुपात शिकायला लागतात आणि भाषेच्या प्रतिकात्मक कार्यावर त्यांची पूर्ण पकड आलेली असते.

२) ते विचारांचे आदान-प्रदान करायला शिकलेले असतात.

३) ते आपल्या भाषेत बोलणे आणि त्याचा प्रयोग करणे शिकलेले असतात.

४) त्यांची आपल्या भाषेत बोलणे आणि त्याचा प्रयोग करणे शिकलेले असतात.

५) त्यांची व्याकरणाची समज वाढून त्याचे ज्ञान त्यांना प्राप्त झालेले असते आणि भाषिक बारकाव्यांबद्दल ते दक्ष झालेले असतात.

६) ते वाचन आणि लेखन कौशल्य प्राप्त केलेले असतात :

मातृ-भाषा यासाठीच विदेशी भाषा शिकण्यासाठी फार मोठे भांडवल असते. यामुळे भाषा ग्रहणाची सहायक प्रणाली प्राप्त होते आणि सर्वात मोठी गोष्ट म्हणजे यामुळे शिक्षण शक्य होते.

''यशस्वी विद्यार्थी मातृभाषेच्या माध्यमातून प्राप्त केलेली भाषिक कौशल्ये आणि वास्तव ज्ञानाच्या शब्द साठ्यास आधार बनवतात. मुख्यतः त्यांच्या विचारास नवीन भाषेत पुन्हा समजून घेण्याची आवश्यकता भासत नाही. त्यांनी प्रथम भाषा म्हणजेच मातृभाषा शिकलेली असते आणि त्यासोबतच संवाद कौशल्ये आणि व्यावहारिक ज्ञान प्राप्त केलेले असते. उदाहरणार्थ विनंती, इच्छा किंवा धमकीचा भाव प्रकट करण्यासाठी वेगळ्या वाक्याची गरज नाही. तर हे भाव प्रकट करण्यासाठी वेगळ्या वाक्याची गरज नाही. तर हे भाव साधारण वाक्यातूनही दर्शविता येतात. व्याकरणिक असलीच पाहिजे या तथ्यावर मातृभाषेचे सामर्थ्य अवलंबून नसते. हे यासाठी की सर्व भाषा अधिकार, गणन, कर्ता, साधन, निषेध, कारण, पैज, आवश्यकता अशा अमूर्त भावनांच्या प्रकटीकरणाच्या सोपस्काराचा विकास केलेली असते, मग ते कोणत्याही प्रकारे का असेना. एका भाषेचे व्याकरण दुसऱ्या भाषेतील व्याकरण समजून घेण्याकरिता पुरेसे असते. कारण सर्व भाषांचा संकल्पनात्मक आधार एकच असतो. मूलगामी अर्थाने आपण भाषा एक वेळेसच शिकत असतो. (*http://en.wikipedia.org/wiki/WolfgangButzkamm*)

आतापर्यंत वर्णन केलेला विचार भारतीय धोरण कर्त्यांच्या डोळ्यावरील इंग्रजीची पट्टी आणि कानातील इंग्रजीचे बोळे काढण्यासाठी पुरेसे असले पाहिजे, पण तरीही इतरत्र या संदर्भात काय व्यवहार होत आहे इकडेही दृष्टीक्षेप टाकणे उचित होईल. हे सत्य आहे की जेथे इंग्रजी विदेशी भाषा शिक्षण माध्यम रुपात आहे तेथे ती बंद तरी झालेली आहे किंवा दिवसेंदिवस कमी होताना दिसते. काही उदाहरणे हे सिद्ध करण्यासाठी पुरेशी होतील.

युगांडाने २००७ मध्ये हे ठरविले की, प्राथमिक शिक्षणातील पहिले तीन वर्ष शिक्षणाचे माध्यम म्हणून मातृभाषा असेल आणि इंग्रजी भाषा एका विषयाच्या रुपात शिकविली जाईल. यात त्यांना सफलता देखील प्राप्त झाली. २००८ मध्ये केल्या गेलेल्या निरीक्षणामधून

आढळून आले की यामुळे तेथील साक्षरतेचे प्रमाण वाढले आहे.

हे लक्ष देण्याजोगे आहे की युगांडा मध्ये ५२ भाषा समूह आहेत. वरील परिवर्तन या विचारावर आधारीत आहे की, जर विद्यार्थ्याची मातृभाषा चांगली असेल तर त्याला विदेशी भाषा सहजतेने शिकता येते. नवीन धोरणापूर्वी युगांडामध्ये शालेय शिक्षण सुरवातीपासूनच इंग्रजी माध्यमातून होत होते. (वरील विचारासाठी पाहा Richard M. Karuma, guardian.co.uk, Friday, 22 May, 2009)

मलेशियाने २००९ मध्ये ठरविले की गणित आणि विज्ञान राष्ट्रीय शाळांमध्ये मलेशिया भाषेत आणि स्थानिक शाळांमध्ये चीनी आणि तमिळ भाषेत शिकविले जातील. (THE FALACCID MIND, Thursday, July 9, 2009, www)

भारतीय धोरणकर्त्याच्या अज्ञानावर यापेक्षा आणखी कोणती टिपण्णी होऊ शकते की, मलेशिया तर तमिळ भाषकांस तमिळमधून विज्ञान शिकविणे ठिक समजतो. पण भारतात हा एक अपराध केल्यासारखा आहे. पंजाबीमध्ये एक म्हण आहे की, 'बुद्धी शिवास विहिरी देखील कोरड्या होतात.' विहिरीची गोष्ट एकीकडे पण भारतीय इंग्रजाळलेल्या लोकांचे डोके मात्र कोरडे पडले आहे. असे आणखी काही उदाहरणे देणे विसंगत होणार नाही.

''मागील काही वर्षांपासून इंग्लंड आणि न्युझीलँड मधील अल्पसंख्यांकांच्या भाषेवर हे देश जास्त लक्ष देत आहे. माओरी भाषा आणि संस्कृती संदर्भात न्युझीलंडचा अलिकडचा इतिहास स.मेओ यांनी आशावादी दृष्टिकोणातून मांडला आहे. न माओरी माध्यम प्राथमिक शाळांचे मूल्यांकन हे दर्शविते की, या मुलांचा शैक्षणिक विकास मुख्य प्रवाहातील मुलांसारखाच आहे, शिवाय या सोबतच त्यांना द्विभाषा प्राप्त करण्याचा फायदा देखील आहे. हाँग-काँग मध्ये पुंतोघुंआ भाषेचा वापर दिवसेंदिवस वाढत आहे.... मलेशियाने सुद्धा मलेशिया भाषेस राजभाषा, शाळा आणि महाविद्यालयीन शिक्षणासाठी शिक्षण माध्यमाचा दर्जा दिला आहे.''(S.Kaur Gill, PP १३५-१५२) (Ammon, २००९)

हे स्पष्ट आहे की सर्व पूर्व इंग्रजी शासित राष्ट्र यास सोडचिठ्ठी देत आहेत. कारण हे आहे की, कोणताही देश भारतीयांसारखा अज्ञानाचा मित्र बनवू इच्छित नाही.

पण विचार करण्यासारखी गोष्ट आहे की हे असे का होत आहे. याचे मुख्य कारण आधुनिक वर्णवाद हा आहे. जे इंग्रजी भाषेस शस्त्र बनवून प्रत्येक फायदा गिळंकृत करु इच्छितात. पण इंग्रजी मनुवादी ज्या वैचारिक आधारांची मदत घेतात त्यास संपविणे आवश्यक आहे. हे आधार म्हणजे काही अंधविश्वास आहेत ज्याचे स्टॉकहोम युनिवर्सिटीच्या २००५ मधील अहवालात चांगले वर्णन केलेले आहे.(पहा Benson,२००५)

## ३.२ भाषे संबंधी आणखी काही भ्रममूलक धारणा -

### ३.२.१ एक राष्ट्र एक भाषा अंधविश्वास -

एका संघराज्य संकल्पनेमध्ये कोणत्याही राष्ट्र-राज्यात एका सर्वमान्य भाषेची आवश्यकता असते. या विचाराने जगातील धोरण कर्त्यांना प्रभावित केलेले आहे. पण कोणतीही एक विदेशी भाषा माथी मारण्याने एकता निर्माण होत नाही. सोमालिया, बरुंदी, खांडा असे देश एक राष्ट्र-राज्य भाषेमुळे स्थिरता प्राप्त करु शकले नाहीत. वस्तुतः बांग्लादेश, पाकिस्तान, म्यानमार आणि श्रीलंका या देशांमध्ये जातीय आणि भाषियक वेगळेपणाचा स्वीकार करण्यातील असफलता हेच अस्थिरतेचे एक मोठे कारण बनले आहे. (Quane,२००३)(Benson,२००५)

### ३.२.२ एक अंधविश्वास की, स्थानिक भाषा आधुनिक संकल्पना अभिव्यक्त करु शकत नाहीत. -

दुसऱ्या भाषांच्या तुलनेत युरोपियन भाषांमध्ये संकल्पना अभिव्यक्तीचे जन्मजात सामर्थ्य आहे. पण जगातील प्रत्येक भाषा आपल्या वक्त्याचे विचार प्रकट करण्यात समर्थ असते आणि गरज पडल्यास नवीन तांत्रिक शब्दावली आणि संरंचनांचा विकास करण्यात समर्थ असते. या गोष्टीचा पुरावा म्हणून लेओपोलेज सेंघर यांनी आईन्स्टाईन यांचा सापेक्षतेचा सिद्धांत सेनेगलची भाषा बोलोफ मध्ये अनुवाद करुन दिला. खरी तफावत ही आहे की लिखित आणि प्रकाशनाच्या माध्यमातून बौद्धिकता आणि विकासासाठी ऐतिहासिकदृष्टया एका भाषेची निवड केली गेली आहे. (Alxandu.,२००३)(Benson,२००५)

वरील विचारावरुन हे स्पष्ट होते की प्रत्येक भाषेमध्ये संकल्पना अभिव्यक्तीचे सामर्थ्य असते. पण या विषयामध्ये इतकी अज्ञानता आहे की त्याचा विस्ताराने आढावा घेणे आवश्यक आहे.

वाक्य संरचनेच्या आधारावर आपण हे अजिबात म्हणू शकत नाही की अमूक एक भाषा जास्त समर्थ आहे किंवा तमुक भाषा कमी समर्थ आहे. प्रत्येक भाषेची वाक्य संरचना थोड्या बहुत फरकाने एकसारखी असते. कोणत्याही दोन भाषातील व्याकरण घेऊन काही पृष्ठे वाचली तर हे स्पष्ट होऊन जाते. ज्या भाषेचे व्याकरण लिहिले गेलेले नाही. ज्यांची वाक्य संरचना देखील लिखित भाषा व्याकरणासारखीच समृद्ध असते. समस्या उभी राहते ती शब्दसंग्रहाने नेहमी ऐकण्यात येते की आपल्या भाषेमध्ये विज्ञान आणि तांत्रिक विषयातील शिक्षणासाठी शब्द नाहीत. पण हा दृष्टिकोण शत-प्रतिशत अज्ञानावर आधारीत आहेत.

वास्तवात प्रत्येक भाषेचे शब्दसामर्थ्य समान असते. कारण प्रत्येक भाषेचे शब्दसंग्रह काही मूलतत्त्वांनी निर्मित होतात आणि या मूळतत्त्वाच्या प्रसंगामध्ये भाषिकदृष्ट्या काही अंतर नाही. उदाहरणस्वरुप आपण खालील इंग्रजी शब्द पाहू शकतो.

1. Haem A prefix signifying blood.
2. Haemacyte A blood cell.
3. Haemagogue Medicine that promotes the catamerial and haemorrhoidal discharges.
4. Haemal Pertaining to the blood.
5. Haemalopia An effusion of the bllod into the globe of the eye; bloodshot eye.
6. Haemngiectasis Dilatation of a blood vessel.
7. Haemangioma A malformation of a blood vessels wich may occur in any

part of the body.

8. Haemarthrosis The presence of blood in a joint carity.

9. Haematemesis The vomiting of blood.

10. Haematin An iron-containing constituent of haemoglobin.

11. Haematinic An agent improving the blood-quality.

12. Haematinuria The presence of haematin in the urine.

13. Haematocele A swelling filled with blood; haematoma.

14. Haematogenesis The development of the blood.

15. Haematiod Having the nature or appearance of blood.

16. Haematology The science dealing with the formation, compisition, function and diseases of the blood.

17. Haematolysis Destruction of blood cells and liberation of haemoglobin.

18. Haematoma The bllod tumour; H. Auris, the blood tumour of the external

(Rawat,१९८५ वरुन उद्धृत)

(याकडे) पाहिल्यानंतर असे वाटेल की मराठी भाषेत या शब्दांना समानार्थी शब्द नाहीत. पण वास्तव हे आहे की हे सर्व शब्द एकाच धातू 'Heam'(रक्त) सोबत वेगवेगळे उपसर्ग लावून तयार झाले आहेत. खाली दिले जाणारे यांचे काही मराठी समानार्थक स्वतः सांगू शकतील की काही वेळातच यांचे मराठी समानार्थी शब्द प्राप्त होऊ शकतात.

१. रक्त, २. रक्त-कोशिका, ३. रक्त-प्रेरक, ४. आरक्त, ५. आरक्त-नेत्र, ६. रक्तवाहिनी -पासार, ७. रक्त-मस्सा, ८. रक्तजोड-विकार, ९. रक्त-वमन, १०. लोहरक्तीय, ११. रक्त-वर्धक, १२. रक्तमूत्र, १३. रक्त-ग्रंथी/सूजन, १४. रक्त-मासधर्मरोध, १५. रक्त-उत्पादन, १६. रक्त रुप, १७. रक्त-विज्ञान, १८. रक्त- ऱ्हास, १९. रक्त-ग्रंथी...

मग आमच्या भाषेत शब्द नाहीत असे म्हणणे हे कोणाच्याही भाषा अज्ञानाचे चांगले प्रमाण होऊ शकते.

वरील इंग्रजी शब्द ज्ञान-विज्ञान आणि इंग्रजी भाषेसंबंधी आणखी एक महत्त्वपूर्ण तथ्य समोर आणतात. या शब्दांमधील एकही शब्द इंग्रजी भाषेचा नाही. हे सर्व लॅटिनमधून सरळ उचलले आहेत. त्यामुळे असे समजणे सुद्धा अतिमूर्खतापूर्ण होईल की, जर आपणास इंग्रजी भाषा येत असेल तर आपणास ज्ञान-विज्ञानाचा शब्दसंग्रह समजेल, कारण इंग्रजी भाषेत ज्ञान-विज्ञानाचे जास्तीत-जास्त शब्द लॅटिन, ग्रीक इत्यादी भाषेचे आहेत, ते इंग्रजीचे नाहीत.

इंग्रजी संक्रमनासंबंधी आणखी एक भ्रममूलक धारणा अशी आहे की, इंग्रजी आल्यानंतर आपणासाठी जगातले दरवाजे उघडले जातात. त्यामुळे जागतिक स्तरावर यासंबंधी काय चालले आहे हे जाणून घेणे आवश्यक आहे.

## ४. सांप्रतकालीन आंतरराष्ट्रीय भाषा दृष्टिकोण :

सांप्रत काळात जगात दोन प्रकारचे भाषा दृष्टिकोण स्पष्टपणे दिसून येतात, एक म्हणजे इंग्रजी भाषेचे कमी होत असलेले महत्त्व आणि दुसरे इंग्रजीशिवाय इतर भाषेचे प्रत्येक क्षेत्रात वाढत चाललेले महत्त्व.

आपण यापूर्वीच पाहिलं आहे की ज्या गैरइंग्रजी भाषक देशामध्ये सुद्धा (महान भारत आणि त्याचे जुने बंधू आणि वर्तमानकालीन भौगोलिक आणि मानसिक शेजारी पाकिस्तान सोडून) शिक्षण इंग्रजीमधून दिल्या जात होतं तेथे एकतर ते समाप्त होत आहे किंवा दिवसेंदिवस शिक्षणाचे माध्यम म्हणून इंग्रजी कमी तरी होत आहे. दुसऱ्या क्षेत्रात सुद्धा असेच होत आहे.

२000 च्या जवळपास इंटरनेटवर ८0 टक्के पेक्षा जास्त माहिती इंग्रजीमधून होती. आता ही टक्केवारी ४0 पेक्षाही कमी आहे आणि आता तर इंटरनेटवर शेकडो भाषेमध्ये माहिती उपलब्ध आहे.

भारताचीच गोष्ट घेतली तर माईक्रोसॉफ्ट कंपनीनुसार भारताचा ९५ टक्के व्यापार गैर-इंग्रजी भाषेच्या माध्यमातून होत आहे आणि केवळ ५ टक्के इंग्रजी भाषेच्या माध्यमातून.

जगभरात इंग्रजीची ही अवस्था बनली आहे की, आपणास केवळ इंग्रजी भाषा येत

असेल आणि दुसरी कोणतीच भाषा येत नसेल, तर कोणतीही कंपनी तुम्हाला सर्वात शेवटी नोकरी देईल. खालील काही उद्धरने (उद्धृत वाक्ये) या गोष्टीचे प्रमाण आहेत की जागतिक भाषेची दिशा कोणीकडे आहे :

''आजच्या कामगारांना इंग्रजी शिवाय दुसऱ्या भाषेमध्ये बोलून आणि लिहून संचार करण्याचे सामर्थ्य प्राप्त करण्याची आवश्यकता आहे.''(Stephanie Bell Rose, The goldman sches Foundation, Vishakha Desai, The Asia Society, www वरुन उद्धृत)

''इंग्रजीने २० व्या शतकाच्या अंतापर्यंत जी एक प्रतिष्ठा प्राप्त केलेली होती, २१ व्या शतकामध्ये अशी प्रतिष्ठा कोणत्याच भाषेत लाभणार नाही. इंग्रजी आणि सूचना तंत्रज्ञानाचा संबंध अल्पकालीन असेल, जशी पूर्वी इंग्रजी भाषा सर्वात अग्रेसर आणि नवतंत्रज्ञानाचा लाभ घेणारी होती, आता हे सत्य राहिले नाही.''(David Graddot, २००० (१९९७))

संपूर्ण जगभर सर्व विकसित राष्ट्रांत सर्व शाळांमधून मातृभाषेसोबतच इतर भाषेचे शिक्षण देण्याचा प्रयत्न होत आहे आणि या इतर भाषेमध्ये केवळ इंग्रजीच नाही.

ऑस्ट्रेलियाने 'आशियाई शिक्षण पाठ्यक्रम' कार्यक्रम तयार करुन प्रत्येक शाळेत एक आशियाई भाषा शिकविणे अनिवार्य केले आहे. (Phillip Coorey, The Sydney Morning Harald, October २९,२०१२)

इथपर्यंत की अमेरिकेमध्ये चीनी भाषेच्या माध्यमातून शिक्षण देणाऱ्या शाळा स्थापन केल्या आहेत. यामध्ये ९० टक्के विद्यार्थी गैर-चीनी आहेत. (ही नीती सुद्धा चुकीची आहे, पण हे स्पष्ट करते की जागतिक स्तरावर आज चीनी भाषा कशी पुढे यत आहे.) अमेरिकेमध्ये २००७ मध्ये चीनी भाषा शिकणाऱ्यांची संख्या २००० च्या तुलनेत फक्त १० टक्के होती. (USA Today, 20th November, 2007)

अमेरिकेमध्ये तर पालक मंडळी गैर-इंग्रजी भाषा शिकण्याच्या मागे लागले आहेत कारण ते आपल्या पाल्यांना दुसरी भाषा शिकण्यात मदत करु शकतील. (Education Update, 15 Marth, 2013)

''जागतिक अर्थव्यवस्थेत चीनचा वाढता प्रभाव स्वीकार करुन, पनामा सर्व शाळांमध्ये चीनी भाषाशिक्षण अनिवार्य करण्याकडे मार्गक्रमण करत आहे.'' (BBC News (www)6th Decmber, 2007)

इथपर्यंत की मुख्यतः इंग्रजी भाषक देशांमध्ये सुद्धा गैर-इंग्रजी भाषक लोक इंग्रजीचा त्याग करत आहेत. अमेरिकेमध्ये १९९० ला ३ कोटी १८ लाख लोकांनी आम्ही घरात इंग्रजी बोलत नाही असे सांगितले होते. २००० च्या जनगणनेनुसार ही संख्या ४ कोटी ७० लाख झाली. ही वाढ या भाषक लोकसंख्येच्या वाढीच्या दरापेक्षा कितीतरी आधिक आहे. या वर्षांमध्ये सपेनी भाषा बोलणाऱ्यांची ६० टक्के पेक्षा अधिक वाढ झाली आहे. १९८० ते २०११ पर्यंत अमेरिकेमध्ये घरात गैर-इंग्रजी भाषा बोलणाऱ्यांची संख्या १४० टक्केने वाढली आहे. ही लोकसंख्या वाढीपेक्षा कितीतरी अधिक आहे.

पूर्व इंग्रजी वसाहत राष्ट्रांमधून कशाप्रकारे इंग्रजी भाषिक संचार तंत्रामधून बाहेर पडत आहे याचे एक चांगले प्रमाण अर्जेटिनाचे हे आकडे दर्शवितातः १९८३ मध्ये संचार-तंत्रा (Media) चे ४९ टक्के देशाच्या बाहेरचे होते जे १९९६ मध्ये घट होऊन २२ टक्केच राहिले आहे.

त्यामुळे आता कोणतीच शंका उरत नाही की ज्या क्षेत्रांमध्ये पूर्वी इंग्रजीचे वर्चस्व होते त्या सर्व क्षेत्रांमधून दिवसेंदिवस इंग्रजी कमी होत आहे.

या गोष्टीकडे सुद्धा प्रकर्षाने लक्ष देणे आवश्यक आहे की, इंग्रजी भाषेमुळे आमचे किती शैक्षणिक, आर्थिक, व्यापार विषयक आणि भाषिक नुकसान होत आहे.

## ५. इंग्रजी भाषा अवलंबिल्यामुळे झालेले आणखी काही गंभीर नुकसान :

आज जगातील जवळपास सर्वच देश आवश्यकतेनुसार दुसऱ्या देशाची भाषा शिकत आहत, आम्ही मात्र इंग्रजीच्या थडग्याला कवटाळून बसलो आहोत. आम्ही इंग्रजीशिवाय कोणत्याच विदेशी भाषा संपादनाकडे लक्ष देत नाहीत ज्यामुळे फार मोठे व्यापारविषयक, आर्थिक नुकसान होत आहे. जर आम्ही दुसऱ्या कोणत्याच देशाची भाषा अवगत करून घेऊ

शकलो नाही तर येणाऱ्या अल्पावधीतच आम्ही वेगळे पडू. आज आमच्यासाठी इंग्रजीपेक्षा चीनी आणि स्पॅनिश भाषा महत्त्वाच्या आहेत. पण आम्ही भविष्य तर सोडाच वर्तमानाबद्दलही डोळेझाक करत आहोत. आज जगातील जवळपास सर्व गैर-इंग्रजी भाषक लोक आपल्या देशांमधून इंग्रजीचा प्रभाव कमी करण्यासाठी झटत आहेत. आम्ही आमचे सर्व शिक्षण, संस्कृती, संदेशन इंग्रजी भाषेच्या स्वाधीन करु लागलो आहोत. यामुळे आम्हाला किती लाभ होत आहे हे पाहण्यासाठी भारताचे जागतिक व्यापारात कमी होणारी टक्केवारी तपासली तरी पुरेसे होईल.

इंग्रजी भाषेतील शिक्षणामुळे आम्हास किती फायदा होत आहे हे आमच्या उच्च शिक्षणाच्या दशेवरुनच स्पष्ट होईल. भारतामध्ये मागील १५० वर्षांपासून उच्च शैक्षणिक स्तरावर विज्ञानाचे शिक्षण इंग्रजीमध्ये होत आहे. पण आमचे एकही विद्यापीठ जागतिक स्तरावरच्या २०० विद्यापीठांच्या यादीत येत नाही. जपान, चीन, कोरिया, रशिया इत्यादी देश आपले सर्व शिक्षण आपल्या भाषेत देत आहेत. परिणामस्वरुप त्यांच्या विद्यापीठांचा दर्जा आमच्या विद्यापीठांपेक्षा कितीतरी अधिक आहे. आमच्या शिक्षणाच्या ढासळलेल्या दर्जाचे सर्वात मोठे कारण शिक्षण इंग्रजी भाषेत असणे हे आहे.

शेवटी आणखी एक तथ्य भारत-आप्तस्वकीयांपुढे आणणे उचित होईल. आजच्या काळात कोणत्याही भाषेचे जीवन आणि विकास यावर निर्भर असतो की, त्या भाषेचा वापर शिक्षणाच्या माध्यमाच्या रुपात होत आहे किंवा नाही. कोणत्याही भाषेच्या अंतामध्ये सर्वात महत्त्वाचे कारण त्या भाषेचा शिक्षणामध्ये वापर न होणे हे आहे. ''शैक्षणिक प्रणालीमधून स्थानिक भाषांना समाविष्ट करुन न घेण्याच्या कारणामुळेही भाषा अस्तंगत होते. भाषा संवर्धन आणि परिणामस्वरूप संस्कृती संरक्षणामध्ये शाळांची केंद्रवर्ती भूमिका असते.''(Eckert, T. et al, 2006)

**खालील अवतरण भाषेचा अंत होण्याची प्रक्रिया अधोरेखित करते.**

''लोक आपली भाषा बोलण्याची लाज बाळगतात आणि त्याजागी श्रेष्ठी जनांच्या भाषेचा वापर करतात. परिणामी त्यांच्या मुलांपर्यंत भाषेचे संदेशन होत नाही. असे, अल्पसंख्याक

भाषेला त्याचा वक्ता बोलणे सोडून देतो आणि संबंधित भाषेचे प्रयोगक्षेत्र नेहमी घटत जाते, जोपर्यंत की नवीन भाषा त्याठिकाणी स्थानापन्न होत नाही.''(McMohan, 1994: 285)

जर सूक्ष्मपणे पाहिलं तर सर्व भारतीय भाषेची स्थिती या दृष्टीने आणखी वाईट होत चालली आहे.

जेव्हापासून भारतीय शाळांमध्ये इंग्रजी माध्यम प्रचलित झाले, त्यानंतरच्या परिस्थितीचा आढावा घेतला तर एका भयावह परिस्थितीचे दर्शन होईल. इंग्रजी माध्यमाच्या प्रचलनामुळे भाषिक पंगुत्वाची एक पिढी तयार होत आहे जी कोणत्याच भाषेत पारंगत नाही. इंग्रजी माध्यमामधून शिकविल्या गेल्यामुळे ही पिढी मातृ-भाषा नीटपणे शिकू शकत नाही. या पिढीच्या मुलांचा इंग्रजी भाषेचा विकास होऊ शकत नाही कारण कोणतेही मूल प्रारंभापासूनच विदेशी भाषा माध्यमातून शिकत असते त्याच्या भाषिक कौशल्याचे सामर्थ्य चांगल्यारीतीने विकसित होऊ शकत नाही. अशामुळे तो कोणतीच भाषा चांगल्या प्रकारे शिकू शकत नाही.

इंग्रजी आमच्या मार्गात आणखी विदेशी भाषा संपदनामध्ये देखील अडथळा ठरत आहे, जे आजच्या काळात व्यापार, अर्थकारण, संपर्क आणि माहितीसाठी अत्यंत आवश्यक आहे. जगात इंग्रजीशिवाय इतर भाषा शिकण्याची जी स्पर्धा लागली आहे आणि इतर भाषा आर्थिक दृष्टीने किती महत्त्वपूर्ण झाल्या आहेत, हे आमचे आधुनिक भारतीय महाराजे लोक पाहण्यास असमर्थ आहेत कारण त्यांच्या डोळ्यावर इंग्रजी भाषेच्या पट्ट्या आणि कानात इंग्रजीचे नाणे घातलेले आहे. परिणामी भारतीय शिक्षण, प्रशासन, ज्ञान-विज्ञान आणि संस्कृतीची हानी झाली आहे. त्यामुळे भारत जागतिक स्तरावर फार मागे पडत आहे हे या आधारे काही आश्चर्य वाटायला नको. भारताच्या आर्थिक शक्तीचा आणि विकासाचा अंदाज तर जागतिक व्यापारात भारताच्या टक्केवारीचे आकडे पाहून स्पष्ट व्हावे जे १९५० मध्ये १.७८ टक्के होते आणि आज १.५० टक्के आहे. ही टक्केवारीच यासाठी पुरेसे प्रमाण आहे की भारतीय नीतीतज्ज्ञांची इंग्रजीवरील सवारी 'कानी घोडी अंधा सवार' म्हणीचे जिवंत उदाहरण आहे.

सांस्कृतिक विध्वंसाविषयी न बोललेलंच बरं होईल. एक अशी वरपांगी पिढी तयार होत आहे जी न आपली भाषा, न इतिहास, न साहित्य, न धर्म, न ज्ञान-विज्ञान आणि न आपल्या लोकांसोबत आंतरिक संबंध बनवू शकते. गुरु नानकांनी तेव्हा फारसी भाषेत गुरफटलेल्या लोकांना म्लेंछ भाषा वाहणारे संबोधले होते. आता जर भारतीय उच्च वर्गाने बाबा नानकांच्या संदेशास इतके खोल गाडून टाकले आहे तर बिचाऱ्या महात्मा गांधींचे कोण ऐकेल. ते तर फक्त धोती परिधान करायचे, भारतीय संस्कृतीला बाय-बाय म्हणून, टाय-वाय लावते तर गोष्ट वेगळी होती.

**विनंती :**

ही पुस्तिका म्हणजे वैज्ञानिक भाषा धोरणावर माझ्याकडून तयार होणाऱ्या पुस्तकातील काही अंश घेऊन तयार केलेली आहे. पुस्तकास थोडाफार विलंब लागत असल्यामुळे पण विषय इतका महत्त्वाचा आहे की, मला वाटलं यातील काही अंश घेऊन लवकरात लवकर ही पुस्तिका भारतीय जनतेसमोर आणली पाहिजे. त्यामुळे ही पुस्तिका प्रथम हिंदीमध्ये लिहिल्या गेली कारण जास्तीत जास्त भारतीय हे वाचू शकतील आणि आपापल्या भाषेमध्ये अनुवाद करुन या गोष्टी जास्तीत जास्त लोकांपर्यंत पोहचू शकतील. त्यामुळे सर्वांना विनंती आहे की याचे वेगवेगळ्या भाषेत अनुवाद करावेत आणि जास्तीत जास्त लोकांपर्यंत वाचण्यासाठी पोहचावेत.

या पुस्तिकेमध्ये बऱ्याच विद्वानांच्या बऱ्याच संशोधनास उद्धृत केले आहे. त्या सर्व विद्वानांचे मी हार्दिक आभार मानतो. हे त्यांच्या कष्ट आणि जिद्दीचाच परिणाम आहे की, मातृ-भाषेला इतका मोठा वैचारिक आधार मिळू शकत आहे.


**लेखक**
**डॉ. जोगा सिंग**
jogasinghvirk@yahoo.co.in
+919915709582
Web: http://punjabiuniversity.academia.edu/JogaSingh/papers
हिंदी, पंजाबी, तामिल, तेलुगु, कन्नड़, मैथिलि, डोगरी, नेपाली, उर्दू में यह दस्तावेज और भाषा पर कुछ और दस्तावेज उपरोक्त पते से पढ़ें।

**अनुवाद**
**डॉ.पुरुषोत्तम जुन्ने,**
मराठी विभाग प्रमुख,
गोदावरी कला वरिष्ठ महा.,
अंबड, जि. जालना.
*psjunne@gmail.com*
(७५८८४२४२५४)